सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने.
मागणी क्र.एल-२,"२०५३ ,जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना
(०६) (०१) पंच,सरपंच, सचिव,अशासकीय सदस्य इत्यादींना
प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३१- सहाय्यक अनुदान (वेतन),
३६-सहाय्यक अनुदान (वेतनेतर)
(संकेतांक क्र. २०५३ ०५७४)(योजनेत्तर)(दत्तमत)
(तिसरा हप्ता) (माहे जानेवारी-मार्च,२०१९)

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः अनुपं-२०१८/प्र.क्र. ५० /आस्था-१५
बांधकाम भवन, तळ मजला, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक : १६ फेब्रुवारी, २०१९.

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग- प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) **शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग-प्रशिक्षण** ११९९/**प्र.क्र.**५८१/६१, **दिनांक** २३.९.१९९८.
३) **शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग -प्रशिक्षण**-२०००/**प्र.क्र.**८५९/४४, **दि.**१२.६.२००१.
४) शासन निर्णय क्रमांक- ग्राम विकास विभाग-अनुपं-२०१८/प्र.क्र. ५० /आस्था-१५, दिनांक १८ मे, २०१८.
५) शासन निर्णय क्रमांक- ग्राम विकास विभाग-अनुपं-२०१८/प्र.क्र. ५० /आस्था-१५, दिनांक १ ऑक्टोबर, २०१८.

शासन निर्णय-

सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षाकरिता मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र.एल-२,"२०५३ ,जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण-राज्यक्षेत्र, ३१-सहाय्यक अनुदान, ३६-सहाय्यक अनुदान(वेतन) (संकेतांक क्र.२०५३ ०५७४) (योजनेतर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांसाठी वेतनेतरसाठी रुपये ३६८०.०० हजार (रु.छत्तीस लक्ष, ऐंशी हजार)व वेतनासाठी रुपये २८२७०.०० हजार (रु.दोन कोटी, ब्याऐंशी लक्ष,

सत्तर हजार) असे एकूण रुपये ३१९५०.०० हजार (रु.तीन कोटी एकोणीस लक्ष, पन्नास हजार) इतकी तरतूद अर्थसंकल्पित केली आहे.

२. ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता माहे एप्रिल ते ऑगस्ट, २०१८ या कालावधीकरिता वेतनेतरकरिता रुपये १५१२.५० हजार (रु.पंधरा लक्ष, बारा हजार, पाचशे) व वेतनासाठी रुपये १०८९९.९७ हजार (रु.एक कोटी, आठ लक्ष, नव्यान्नव हजार, नऊशे सत्तर) असे एकूण रुपये रु.१२४१२.४७ हजार (रु.एक कोटी, चोवीस लक्ष, बारा हजार, चारशे सत्तर) इतके अनुदान माहे एप्रिल ते ऑगस्ट, २०१८ या कालावधीकरिता पहिला हप्ता म्हणून दिनांक १८ मे, २०१८ च्या शासन निर्णयान्वये आणि माहे सप्टेंबर ते डिसेंबर, २०१८ या कालावधीकरिता वेतनेतरसाठी रु. १०६३.५० हजार (रु. दहा लक्ष, त्रेसष्ट हजार, पाचशे) व वेतनासाठी रु.८८८८.६४ हजार (रु. अठ्ठाऐंशी लक्ष, अठ्ठाऐंशी हजार, सहाशे चाळीस) असा एकूण रु ९९५२.१४ हजार (रु. नव्यान्नव लक्ष, बावन्न हजार, एकशे चाळीस) इतके अनुदान दुसरा हप्ता म्हणून ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्र यांना वितरीत करण्यात आले आहे .

३. सन २०१८-१९ च्या उर्वरित कालावधीसाठी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र . अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.२५ जानेवारी, २०१९ अन्वये महसूली लेख्यातील निधी ९०% या मर्यादेत वितरीत करावयाचे आहे. तसेच ३६ सहायक अनुदाने (वेतन) करीता १००% तरतूदीच्या प्रमाणात निधी वितरीत करावयाचा आहे. त्याअनुषंगाने माहे जानेवारी ते मार्च, २०१९ या कालावधीकरिता अन्वये ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्र यांना अर्थसंकल्पिय तरतूदीप्रमाणे वेतनेतरसाठी रु.७३६.०० हजार (रु. सात लक्ष,छत्तीस हजार ) व वेतनासाठी रु.५८०६.६० हजार (रु. अठ्ठावन्न लक्ष, सहा हजार, सहाशे ) असा एकूण ६५४२.६० हजार (रु. पासष्ट लक्ष, बेचाळीस हजार, सहाशे ) इतका निधी तिसरा हप्ता म्हणून वितरीत करण्यात येत आहे. सदरहू अनुदान सोबत जोडलेल्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

४. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र.प्रशिक्षण ११९८/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८ व शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. प्रशिक्षण २०००/ प्र.क्र.८५९ /४४, दिनांक १२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषंगाने संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

५. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे , त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त

(आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. मात्र उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र यांनी वेतन/वेतनेतर खर्चाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे, याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/वेतनेतर खर्चाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशिक्षण केंद्रांच्या प्राचार्यांची असेल.

७. हा खर्च मागणी क्र .एल-२,"२०५३ ,जिल्हा प्रशासन -०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच,सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), ३६-सहाय्यक अनुदान (वेतन) (संकेतांक क्र. २०५३ ०५७४) (योजनेत्तर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो या लेखाशीर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा तसेच सदर खर्च त्याच लेखाशिर्षाखाली खर्च पडतो आहे , याबाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे अहरण व संवितरण अधिकारी म्हणून विभागीय आयुक्त काम पाहतील.

८. नियोजन व वित्त विभागाने निर्गमित यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना प्रचलित निकष वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि .०२ एप्रिल, २०१८ व २७ जुलै, २०१८ व दिनांक ५ डिसेंबर २०१८ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे संबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे.

९. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्यत-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत/ सुविधा पुरवतील.

१०. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून व वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दि.२५ जानेवारी, २०१९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१४१४५२०२४७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by
Shashank Y Barve
Date: 2019.02.16 17:33:01
+05'30'

( शशांक य. बर्वे )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त, अमरावती (२ प्रती)
२. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
४. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
६. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
७. उप महासंचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
८. वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, जि. अमरावती.
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७, वित्त-८ ग्राम विकास विभाग (२ जादा प्रतींसह)
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग.

## परिशिष्ट

| | शासन निर्णय क्र.अनुपं.२०१८/प्र.क्र. ५० /आस्था-१५,दि. १६ फेब्रुवारी,२०१९ | | | |
|---|---|---|---|---|
| | माहे जानेवारी ते मार्च,२०१९ या कालावधीतील तिसऱ्या हप्त्याचे वितरण (रु. हजारात) | | | |
| अ.क्र. | पंचायत राज प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतनेतर | वेतन | एकूण |
| १ | कोसबाड हिल, जि.पालघर | ८३.६७ | ४७०.०० | ५५३.६७ |
| **अ)** | **विभागीय आयुक्त, कोकण** | **८३.६७** | **४७०.००** | **५५३.६७** |
| २ | वर्ये, जि.सातारा | ८३.६७ | ६९०.०० | ७७३.६७ |
| ३ | गारगोटी, जि.कोल्हापूर | ८३.६७ | १०७२.०० | ११५५.६७ |
| ४ | गौडगांव, जि.सोलापूर | ०.८२ | ५५८.०० | ५५८.८२ |
| **ब)** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **१६८.१६** | **२३२०.००** | **२४८८.१६** |
| ५ | मुरुड, जि.लातूर | ०.०० | २५७.२४ | २५७.२४ |
| **क)** | **विभागीय आयुक्त, औरंगाबाद** | **०.००** | **२५७.२४** | **२५७.२४** |
| ६ | हनुमान नगर, जि.नागपूर | ८३.६७ | ३६५.०० | ४४८.६७ |
| ७ | मूल, जिल्हा चंद्रपूर | ८३.६७ | ५०५.०० | ५८८.६७ |
| **ड)** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **१६७.३४** | **८७०.००** | **१०३७.३४** |
| ८ | खिरोदा, जि.जळगाव | ८३.६७ | १६९.४२ | २५३.०९ |
| **इ)** | **विभागीय आयुक्त, नाशिक** | **८३.६७** | **१६९.४२** | **२५३.०९** |
| ९ | खामगांव, जि.बुलढाणा | ८३.६७ | ९०६.८६ | ९९०.५३ |
| १० | शिवाजीनगर, जि.अमरावती | ८३.६७ | ४३९.१२ | ५२२.७९ |
| ११ | पुसद, जि.यवतमाळ | ६५.८२ | ३७३.९६ | ४३९.७८ |
| **ई)** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **२३३.१६** | **१७१९.९४** | **१९५३.१०** |
| | **अ)+ब)+क)+ड)+इ)+ई)** | ७३६.०० | ५८०६.६० | ६५४२.६० |

Digitally signed by
Shashank Y Barve
Date: 2019.02.16 17:34:23
+05'30'

( शशांक य. बर्वे )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.